**शासन निर्णय**
**मृद सर्वेक्षण आणि अन्वेषण व मृद विश्लेषण रसायन प्रयोगशाळा या योजनेतील अस्थायी पदे दिनांक ०१/०६/२०२० ते दिनांक ३१/०८/२०२० पर्यंत पुढे चालु ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मृदस १४१९/ प्र.क्र. ५५/१७-अे**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक**
**मंत्रालय, विस्तार, मुंबई ४०००३२.**
**दिनांक :- ०१/०७/२०२०.**

वाचा:-

१. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक: पदनि २०१६/ प्र.क्र. ८/ १६/ आ.पु.क्र., दि. १२/०२/२०२०
२. कृषि आयुक्तालयाचे पत्र जा.क्र. योचाप्र/ मृचाप्र/ २०२०-२१/ आस्थापना-५ (निप)/ ६६६५, दि. १५/०२/२०२०.
३. कृषि विभागाचा शासन निर्णय क्रमांक: मृदस १४१९/ प्र.क्र. ५५/ १७-अे, दि. १९/०३/२०२०.
४. वित्त विभागाचे परिपत्रक क्र. संकीर्ण-२०२०/ प्र.क्र. ६२/ कोषा/प्रशा-५, दि. ३१/०३/२०२०.
५. कृषि विभागाचा शासन निर्णय क्रमांक: मृदस १४१९/प्र.क्र.५५/१७-अे, दि. १६/०४/२०२०.
६. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. जा.क्र. योचाप्र/मृचाप्र/ २०२०-२१/ आस्थापना-५ (निप)/ २९४, दि. २९/०५/२०२०.

प्रस्तावना:

मृद सर्वेक्षण आणि अन्वेषण व मृद विश्लेषण रसायन प्रयोगशाळा या योजनेतील ३७७ मंजूर पदांपैकी २२२ स्थायी पदे वगळता उर्वरीत १५५ अस्थायी पदे दिनांक ३१/०८/२०२० पर्यंत चालु ठेवण्यास वित्त विभागाने संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये दिलेल्या अधिकारान्वये, या विभागाचा संदर्भ क्र. ३ येथील दिनांक १९/०३/२०२० चा शासन निर्णय निर्गमित करण्यात आलेला होता.

तद्नंतर, राज्यामध्ये कोव्हीड-१९ मुळे निर्माण झालेल्या आरोग्य व आर्थिक आपत्तीवर मात करण्यासाठी शासनाच्या विविध विभागामार्फत उपाययोजना करण्यात येत असल्यामुळे, सर्व खाजगी आस्थापना व उद्योग बंद असून त्यातून प्राप्त होणाऱ्या महसुलात लक्षणीय घट झालेली आहे. आर्थिक वर्षाअखेर राज्याची एकंदर आर्थिक परिस्थिती विचारात घेता, खर्चात काटकसर करणे तसेच काही खर्च पुढे ढकलणे गरजेचे आहे. त्यामुळे, संदर्भ क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये वित्त विभागाने राज्यातील सर्व अस्थायी पदांना दिनांक ३१/०५/२०२० पर्यंत मुदतवाढ दिलेली होती. त्याअनुषंगाने, शासन निर्णय शुध्दीपत्रक दिनांक १६/०४/२०२० नुसार अस्थायी पदांना दिनांक ३१/०५/२०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. आता, वित्त विभागाने त्यांचे संदर्भ क्र. १ येथील पत्रान्वये देण्यात आलेल्या मुदतवाढीमध्ये कोणताही बदल केला नसल्याचे सूचित केलेले आहे. सबब, वित्त विभागाचे सूचनेनुसार सदर अस्थायी पदे दिनांक ०१/०६/२०२० ते दिनांक ३१/०८/२०२० पर्यंत या कलावधीत पुढे चालु ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

मृद सर्वेक्षण आणि अन्वेषण व मृद विश्लेषण रसायन प्रयोगशाळा या योजनेतील ३७७ मंजूर पदांपैकी २२२ स्थायी पदे वगळता उर्वरीत १५५ अस्थायी पदे आकृतीबंधात समाविष्ट असल्याचे अधीन राहून दिनांक ०१/०६/२०२० ते दिनांक ३१/०८/२०२० पर्यंत पुढे चालु ठेवण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. (सोबत विवरणपत्र जोडले आहे)

या प्रित्यर्थ होणारा खर्च सन २०२०-२१ करीता मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा. सदर खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्रमांक : डी-३
२४०२, मृद व जलसंधारण,
१०१, मृद सर्वेक्षण व चाचणी,
(००) (०२) मृद सर्वेक्षण आणि अन्वेषण व मृद विश्लेषण रसायन प्रयोगशाळा
( २४०२ ००३२)

हे आदेश वित्त विभागाने यापूर्वी निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र. पदनि २०१६/ प्र.क्र. ८/ १६/ आ.पु. क. दिनांक १२/०२/२०२० अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार व सचिव (कृषि) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००७०३१३१५५७१२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prakash
Rawoo Kadam

Digitally signed by Prakash Rawoo Kadam
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=944e446a6b36b86a52f12def26aa74e1d37e67433a0ce27e6a2caf774b9795c6, cn=Prakash Rawoo Kadam
Date: 2020.07.03 14:01:10 +05'30'

**( प्रकाश रा. कदम )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा. मंत्री (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
२. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
३. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
४. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/ नागपूर
५. कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
६. कृषि सहसंचालक (आस्थापना), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
८. सर्व जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी
९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१०. उप संचालक (बियाणे), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
११. प्रशासन अधिकारी, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१२. सर्व जिल्हा शासकीय मृद सर्वेक्षण व मृद चाचणी प्रयोगशाळा
१३. वित्त विभाग (वित्तीय सुधारणा), मंत्रालय, मुंबई
१४. कार्यासन (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. निवडनस्ती (१७-अे कार्यासन)

**शासन निर्णय कृषि व पदुम विभाग मृदस १४१९/ प्र.क्र. ५५/ १७-अे**
**दिनांक : ०१ /०७/२०२० चे सहपत्र**

**विवरण पत्र**

| **अ.क्र.** | **पदनाम** | **पदसंख्या** |
|---|---|---|
| १ | मृद सर्वेक्षण व मृद चाचणी अधिकारी | २३ |
| २ | कृषि पर्यवेक्षक | १८ |
| ३ | कृषि सहाय्यक | २० |
| ४ | वरिष्ठ लिपीक | २३ |
| ५ | लिपीक | १५ |
| ६ | अनुरेखक | ० |
| ७ | वाहन चालक | २२ |
| ८ | शिपाई | ३४ |
| | **एकूण** | **१५५** |